**पर्यावरण नुकसान भरपाई निधीचे नियोजन आणि वापर याकरिता अंतर्गत समिती आणि राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती गठीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एनजीटी-२०२२/ प्र.क्र.२७ / एसईआयएए**
१५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- २१ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१. पर्यावरण (संरक्षण) अधिनियम, १९८६ आजपर्यंत दुरुस्ती केल्याप्रमाणे
२. पर्यावरण आघात मुल्यांकन अधिसुचना, २००६ आजपर्यंत दुरुस्ती केल्याप्रमाणे
३. मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांनी मुळ अर्ज क्र. ९७६/२०१९ मधील संकीर्ण अर्ज क्र. ७४/२०२२ मध्ये पारित केलेले दि. २१.१०.२०२२ रोजीचे आदेश

**प्रस्तावना:-**

मा. राष्ट्रीय हरीत लवाद, मुख्य खंडपीठ, नवी दिल्ली यांनी मुळ अर्ज क्र. ९७६/२०१९ मधील संकीर्ण अर्ज क्र. ७४/२०२२ मध्ये दि. २१.१०.२०२२ रोजीच्या आदेशान्वये, सर्व राज्ये/केंद्रशासित प्रदेशांच्या मुख्य सचिवांनी पर्यावरण नुकसान भरपाई निधीचे नियोजन आणि वापर या करिता अद्ययावत कृती आराखडे तयार करून त्याची अंमलबजावणी करणे, पर्यावरण नुकसान भरपाई निधी मुख्य सचिवांच्या अखत्यारीतील एका वेगळ्या खात्यात जमा करणे व अशा निधीच्या वापराची अंमलबजावणी मुख्य सचिवांनी प्राधान्याने एका महिन्याच्या आत तीन अतिरिक्त मुख्य सचिवांच्या उच्चाधिकार समितीकडे सोपविण्याबाबत आदेश दिले आहेत. मा. राष्ट्रीय हरीत लवादाच्या उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मा. राष्ट्रीय हरीत लवादाचे दि. २१.१०.२०२२ रोजीच्या आदेशाच्या अनुषंगाने, पर्यावरण नुकसान भरपाई निधीचे नियोजन आणि वापर याकरिता अद्ययावत कृती आराखडे तयार करून त्याची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याकरिता खालील प्रमाणे राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती गठित करण्यात येत आहे.

**राज्यस्तरीय उच्चाधिकार समिती-**

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, महाराष्ट्र शासन | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव, नगर विकास विभाग-२, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ४ | प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव, उद्योग विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ७ | सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| ८ | संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, महाराष्ट्र शासन | सदस्य सचिव |

सदर राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

अ) पर्यावरण मानकांचे व त्यासंबधित कोणत्याही निर्देशांचे पालन न करणा-या उद्योगांना/संस्थांना पर्यावरणीय नुकसान भरपाई तत्व लागू करणे व त्यामधून प्राप्त होणारी रक्कम स्वतंत्र बँक

खात्यात जमा करणे. त्याचप्रमाणे, सदर रक्कम पर्यावरण संरक्षणाकरिता खर्च करण्याकरिता मार्गदर्शक प्रणाली तयार करणे.

ब) मा. राष्ट्रीय हरीत लवादाने मुळ अर्ज क्र. ३६०/२०१८ मधील दि. २६.०९.२०१९ रोजीच्या दिलेल्या आदेशानुसार, पर्यावरणीय नुकसान भरपाई निधी वापरासाठीच्या योजना या राज्य/जिल्हा पर्यावरण योजनांशी सुसंगत असल्याची खात्री करणे.

क) पर्यावरणीय नुकसान भरपाई निधी वापरासाठीच्या योजना, त्यांच्या अंमलबजावणीतील प्रगती दर सहा महिन्यांनी राज्ये/केंद्रशासित प्रदेशांच्या संकेतस्थळावर ठेवणे.

ख) राज्यातील तळागाळापर्यंतच्या सर्व शाळा आणि महाविद्यालयांमध्ये पर्यावरण जागृतीसाठी इको क्लबच्या माध्यमातून शिक्षण विभागामार्फत निधीचा काही भाग देण्यात येईल , याची खात्री करणे.

ग) याविषयाबाबतच्या काही कायदेशीर मुद्यांच्या अनुषंगाने विधी व न्याय विभागाशी समन्वय साधण्याची मुभा समितीस राहिल.

क) समितीची तीन महिन्यांत किमान एकदा बैठक होईल.

मा. राष्ट्रीय हरीत लवादाचे दि. २१.१०.२०२२ रोजीचे आदेशाच्या अनुषंगाने, गठीत केलेल्या राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीस सहाय्य करणेसाठी खालील प्रमाणे अंतर्गत समिती गठित करण्यात येत आहे.

**अंतर्गत समिती**

| | | |
|---|---|---|
| १ | श्री. बी. सी. खटूआ, भा. प्र. से. (Retd) | अध्यक्ष |
| २ | केंद्रिय प्रदुषण नियंत्रण मंडळाचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | भारतीय तंत्रज्ञान संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्थेचे प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | तांत्रिक प्रमुख, विधी अधिकारी १ व २, महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ | सदस्य |
| ७ | संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल, महाराष्ट्र शासन | सदस्य |
| ८ | ३ तज्ञ व्यक्ती /संस्था यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ९ | सह संचालक (हवा प्रदूषण) | सदस्य सचिव |

सदर अंतर्गत समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

अ) पर्यावरणीय नुकसान भरपाई निधी वापरासाठीच्या योजना तयार करुन राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीस शिफारस करणे.

ब) पर्यावरणीय नुकसान भरपाई निधीच्या वापरासाठी खालील योजनांचा विचार केला जाऊ शकतो:

१) पर्यावरण मानके व संबधित निर्देशांचे अनुपालन पडताळणीसाठी औद्योगिक तपासणी.

२) सध्या कार्यरत नियंत्रण प्रणाली (Monitoring Network) मजबूत करण्यासाठी पाण्याच्या व हवेच्या गुणवत्तेच्या सतत देखरेख केंद्रांची स्थापना.

३) औद्योगिक क्षेत्रे/स्वच्छ तंत्रज्ञानावरील सर्वसमावेशक उद्योग दस्तऐवज तयार करणे.

४) पर्यावरणाच्या हानीचा तपास, डीपीआर तयार करणे.

५) प्रदूषित क्षेत्रांचे निराकरण.

६) शहरी स्थानिक स्वराज्य संस्था (ULBs) / SPCBs / PCC ची क्षमता वाढवणे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३२२१४१८३९४१०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY SUDHAKAR PATIL

Digitally signed by VIJAY SUDHAKAR PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=7597374b14a075268ebb99ffc97bf93be9da2a38eddfc7bc45fd1898efb7e0ee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB634C989CC341AA7A98816A45B9A1B45A57333D0362B80C797A318B7923F098, cn=VIJAY SUDHAKAR PATIL
Date: 2024.03.22 14:28:01 +05'30'

**(विजय सु.पाटील)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहिती करिता:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
२) मा. उप मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई-३२
४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग-१, मंत्रालय, मुंबई-३२
५) प्रधान सचिव, नगर विकास विभाग-२, मंत्रालय, मुंबई-३२
६) अ.मु.स., महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) प्रधान सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) सदस्य सचिव, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१२) संचालक, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई-३२
१३) सह संचालक (हवा प्रदूषण नियंत्रण), महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१४) विधी अधिकारी १ व २, महाराष्ट्र प्रदुषण नियंत्रण मंडळ, मुंबई.
१५) श्री. बी. सी. खटूआ, भा. प्र. से. (Retd)
१६) केंद्रिय प्रदुषण नियंत्रण मंडळाचे प्रतिनिधी
१७) भारतीय तंत्रज्ञान संस्थेचे प्रतिनिधी
१८) राष्ट्रीय पर्यावरण अभियांत्रिकी संशोधन संस्थेचे प्रतिनिधी
१९) वीरमाता जिजाबाई तंत्रज्ञान संस्थेचे प्रतिनिधी